**केंद्र शासनाच्या उदय योजने अंतर्गत महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित (महावितरण) यांना दिलेल्या कर्जाच्या रकमेची परतफेड करण्यासाठी अनुदान समायोजनाने वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. निधिवि-२०१७/प्र.क्र.२१(१)/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक - ३१ मार्च, २०१७

संदर्भ - १. शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१५/प्र.क्र.३०४/उर्जा-५, दिनांक २७/१२/२०१६
२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/.क्र.८९/अर्थ-३, दि.०८ फेब्रुवारी २०१७.
३. शासन निर्णय क्र.पूरक-२०१७/प्र.क्र.१७/प्रशासन-१, दि.२४ मार्च, २०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यातील वीज वितरण कंपन्यांची कार्यक्षमता व आर्थिक सक्षमता सन २०१९ पर्यत वाढविण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने दिनांक २० नोव्हेंबर, २०१५ रोजी उदय योजना सुरु केली आहे. या योजने अंतर्गत महावितरण कंपनीकडे दिनांक ३०/०९/२०१५ रोजी असणा-या मध्यम व लघु मुदतीच्या कर्ज रकमेच्या ७५ टक्के रक्कम रु.४९५९.७५ कोटीचे Non SLR/SDL रोख्यांच्या मूळ मुद्दलाच्या रकमेची व त्यावरील व्याजाच्या रकमेची परतफेड शासनास महावितरण कंपनीकडून Back to Back Arrangement द्वारे करण्यास मान्यता दिली आहे. **त्यानुसार राज्य शासनाने सदर कर्ज रोखे उभारुन** महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित (महावितरण) यांस पाच वर्षाच्या कालावधीकरिता कर्ज स्वरुपात रु.४९५९.७५ इतकी रक्कम उपलब्ध करुन दिली असून सदर कर्जाची परतफेड महावितरण कंपनीला सन २०१६-१७ ते २०२०-२१ या पाच वित्तीय वर्षात करावयाची आहे. त्यामुळे महावितरण कंपनीला अनुदानाचा पहिला हप्ता रक्कम रु.९९१.७५ कोटी निधी स्वरुपात उपलब्ध करुन देण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र.३ अन्वये मार्च २०१७ च्या अधिवेशनात पुरवणी मागणी द्वारे रक्कम रु.९९१.७५ कोटी (रुपये नऊशे एक्याण्णव कोटी पंच्याहत्तर लाख फक्त ) ची तरतूद सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात करण्यात आली आहे. सदरची रक्कम अनुदान स्वरुपात महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित (महावितरण) यांस समायोजनाने उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केद्र शासनाच्या उदय योजने अंतर्गत उभारलेल्या Non SLR/SDL रोख्यांवरील कर्जाची परतफेड करण्यासाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित (महावितरण) यां कंपनीस रु.९९१.७५ कोटी (रुपये नऊशे एक्याण्णव कोटी पंच्याहत्तर लाख फक्त ) इतकी रक्कम अनुदानाच्या स्वरुपात समायोजनाद्वारे वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे,त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ८० सर्वसाधारण, ८०० इतर खर्च, (००), (००)(०४) महाराष्ट्र राजय विद्युत मंडळ होल्डिंग कंपनी मर्यादित यांस सहाय्यक अनुदान (अनिवार्य) २८०१२६५१ योजनेत्तर ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षा २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधुन खर्ची टाकावा व तो खालील लेखाशीर्षात समायोजीत करण्यात यावा.

| तपशील | रक्कम | लेखाशीर्ष |
|---|---|---|
| उदय योजने अंतर्गत महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना **राज्य शासनाने सदर कर्ज रोखे उभारुन** दिलेल्या कर्जाच्या परतफेडीचा पहिला हप्ता | रु.९९१.७५ कोटी | ६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे, २०५ पारेषण व वितरण इत्यादि, (००)(०४) महाराष्ट्र राज्य विज वितरण कंपनीला कर्ज , ६८०१५१२१ |
| एकूण | रु.९९१.७५ कोटी | |

४. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ यांनी त्यांच्या अखत्यारीत व अधिकारात रु.९९१.७५ कोटी (रुपये नऊशे एक्याण्णव कोटी पंच्याहत्तर लाख फक्त )चे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५३/१७/व्यय-१६ दिनांक १३/०२/२०१०७ नुसार दिलेल्या सहमतीने तसेच वित्त विभाग ऋण व हमी संनियंत्रण कक्ष यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.४४/अर्थ-१४,दिनांक २०/०२/२०१७ मधील मंजुरीस अनुसरुन निर्गमीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०३३१२११४३२६५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=83469494bac86099a320f3e14bf8421ee9d2b48e344470b76ea2595df04951b4, serialNumber=02c5c00269dd48836be0d9939bdff848a9ff1f1a9fd195baf3a104d09b0817d9, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2017.04.13 16:55:24 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

1) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती वितरण मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१

२) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

३) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

५) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.

६) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.

७) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.

८) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.

९) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

१०) क.अ.अधिकारी (प्रशा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.

११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.

१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग,ऊर्जावकामगारविभाग,सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.

१३) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२